सन २०१९-२०२० या वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य.

महाराष्ट्र शासन

ग्राम विकास विभाग

शासन निर्णय क्रमांकः मजिअ - २०१९/प्र.क्र. ६४/योजना-३

मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.

दिनांक: २६ मार्च, २०२०

**वाचा :-**

१. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.एनआरएलएम-२०११/प्र.क्र.१९६/योजना-३, दिनांक १८ जुलै, २०११.

२. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जी-२००१७/१/२०१८-आरएल (एनआरएलएम_६१ बी), दिनांक ०७ मार्च, २०१९.

३. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जी-२००१७/१/२०१८-आरएल (एनआरएलएम_७१ बी), दिनांक १५ मार्च, २०१९.

४. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मजिअ-२०१९/प्र.क्र.६४/योजना-३, दिनांक १३ जून, २०१९.

५. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.जे-१२०२५/१/२०१९-आरएल (एनआरएलएम_४० बी), दिनांक १३ डिसेंबर, २०१९.

६. शासन निर्णय, ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्र.मजिअ-२०१९/प्र.क्र.६४/योजना-३, दिनांक ०७ जानेवारी, २०२०.

७. मुख्य कार्यकारी अधिकारी, उमेद - महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांचे पत्र क्र.एमएसआरएलएम/लेखा/४८३३/२०१९, दिनांक ३० डिसेंबर, २०१९.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने सन २०१९-२० या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य या योजनेकरिता दुसरा हप्ता संदर्भाधीन क्र.५ अन्वये निधी वितरीत केलेला आहे. सदर निधी राज्याच्या एकत्रित निधीमध्ये जमा झालेला आहे. सन २०१९-२०२० मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान (MSRLM) अंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्ग (SCSP) केंद्र हिस्सा (२५०१ २८६४) याकरिता रु.१०४,४०,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु.६८,३५,५०,०००/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे तसेच केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २८१९) याकरिता रु.६९,६०,००,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पीत करण्यात आली असून त्यापैकी रु.५९,५१,०७,३३४/- इतकी रक्कम अद्यापर्यंत वितरीत केली आहे. आता सन २०१९-२० मधील सदर केंद्र हिस्सा रु.४४,२४,४५,०००/- व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा रु.२९,४९,६३,३३३/- असा एकूण रु.७३,७४,०८,३३३/- इतका निधी वितरित करणे आवश्यक आहे. परंतु केंद्र हिश्याकरिता

अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.३६,०४,५०,०००/- व राज्य हिश्याकरिता अर्थसंकल्पीत केलेल्या तरतूदीतून रु.१०,०८,९२,६६६/- इतकी तरतूद शिल्लक आहे. सबब, केंद्र हिस्सा रु.३६,०४,५०,०००/- व राज्य हिस्सा रु.१०,०८,९२,६६६/- असा एकूण रु.४६,१३,४२,६६६/- इतका निधी वितरित करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :-**

१. सन २०१९-२०२० मध्ये महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला (MSRLM) विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जाती प्रवर्गासाठी (SCSP) अर्थसहाय्य या योजनेचा केंद्र हिस्सा (२५०१ २८६४) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.३६,०४,५०,०००/- (रुपये छत्तीस कोटी चार लाख पन्नास हजार फक्त) व केंद्र हिस्सा समरुप राज्य हिस्सा (२५०१ २८१९) याकरिता केलेल्या तरतूदीतून रु.१०,०८,९२,६६६/- (रुपये दहा कोटी आठ लाख ब्यान्नव हजार सहाशे सहासष्ट फक्त) असा एकूण रु.४६,१३,४२,६६६/- इतका निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणाली (B.D.S) द्वारे महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानास वितरीत करण्यात येत आहे.

२. सदर रक्कम उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, बेलापूर, नवी मुंबई यांच्याकडे आहरण व संवितरण अधिकारी म्हणून सुपूर्द करण्यात येत आहे.

३. सदर रक्कम रु.३६,०४,५०,०००/- इतका खर्च "मागणी क्र.एल - ३, २५०१ ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) (०९) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला विशेष घटक योजनेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य (SCSP) (केंद्र हिस्सा ६०%), ३३ अर्थसहाय्य (२५०१ २८६४)" या लेखाशिर्षाखाली व रु.१०,०८,९२,६६६/- इतका खर्च “मागणी क्र.एल ३, २५०१, ग्रामीण विकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वरोजगार कार्यक्रम, १०१, स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार योजना, (०१) स्वर्णजयंती ग्राम स्वरोजगार, (०१) (०६) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानाला विशेष घटक योनजेखाली अनुसूचित जातींना अर्थसहाय्य, (SCSP) (राज्य हिस्सा ४०%), ३३ अर्थसहाय्य, (२५०१ २८१९)” या लेखाशिर्षाखाली सन २०१९-२०२० मध्ये केलेल्या तरतूदी मधून भागवावा.

४. हे अनुदान अनुसूचित जाती व नवबौध्द प्रवर्गासाठी तसेच ज्या प्रयोजनाकरीता मंजूर करण्यात आलेले आहे, त्याच प्रयोजनाकरीता खर्च करण्यात यावे. अन्यथा ती वित्तीय अनियमितता समजण्यात येईल, याची अमंलबजावणी करणाऱ्या अधिकाऱ्यांनी नोंद घ्यावी.

५. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेले अनुदान कोषागारातून काढल्यानंतर पुढील माहिती त्वरीत लेखाधिकारी कार्यासन क्रमांक योजना-२, ग्राम विकास विभाग यांचेकडे पाठवावी. १) मंजूर केलेली रक्कम, २) कोषागारातून काढलेली रक्कम, ३) रक्कम काढल्याचा प्रमाणक क्रमांक व दिनांक, ४) महालेखापाल कार्यालयातील रक्कमेशी ताळमेळ केल्याचे प्रमाणपत्र.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग परिपत्रक्र दिनांक ८ जुलै, २०१९ अन्वये दिलेल्या केंद्र पुरस्कृत योजनांसाठी निधी तसेच राज्य शासनाचा समरुप हिस्सा प्रशासकीय विभागांने त्यांचे स्तरावर वितरित

करण्याच्या प्रदान केलेल्या अधिकारानुसार तसेच वित्त विभागाचा अनौ.संदर्भ क्र.०८/अर्थोपाय, दिनांक ०६.०१.२०२० व अनौ.संदर्भ क्र.९६/२०२०/व्यय-१५, दिनांक २७.०२.२०२० अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००३२६१३५१३७४७२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PANDIT KAHANDERAO JADHAV

Digitally signed by PANDIT KAHANDERAO JADHAV
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=130c3faa5ebf138c8b39058785ac534c17d9b377a1b84b0b4d591d63ea56da06, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f5c40942371a6969108d4d7e802129ea5f7a19f482726930e17fe1f06ad5cc76, ou=NA, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PANDIT KAHANDERAO JADHAV
Date: 2020.03.26 16:15:55 +05'30'

**( पं. खं. जाधव )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (पाच जादा प्रतींसह)
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
३) उप संचालक (वित्त व लेखा), महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५ वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड), सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई - ४०० ६१४.
४) जिल्हा कोषागार अधिकारी , ठाणे,
५) उप कोषागार अधिकारी, कोकण भवन, बेलापूर, नवी मुंबई.
६) कक्ष अधिकारी (विघयो) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७) वित्त विभाग (व्यय-१५) व ( अर्थ-१७) मंत्रालय मुंबई-३२.
८) कार्यासन अधिकारी, वित्त-१, वित्त-७, योजना-२, ग्राम विकास व जलसंधारण विभाग.
९) निवडनस्ती.